अतितात्काळ

विधानमंडळाच्या जुलै, २०२३ च्या अधिवेशनात सादर केलेले सन २०२३-२०२४ चे खर्चाचे पूरक विवरणपत्र.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**परिपत्रक क्रमांक : पूरक-२०२३/प्र.क्र.६२/अर्थ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ जुलै,२०२३.

**परिपत्रक**

**सन २०२३-२०२४** या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र **दिनांक १७ जुलै, २०२३** रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले. सदर पुरवणी खर्चास आता विधानसभेने मान्यता दिली आहे. दिनांक ३१ मार्च, २०२४ रोजी संपणा-या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपाल महोदयांनी संमती दिली आहे आणि ते, महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२३ **(सन २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-३१)** म्हणून दिनांक २७ जुलै, २०२३ च्या महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण,भाग-४, यामध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांना असे कळविण्यात येत आहे की, त्यांनी पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार मंजूर झालेल्या पूरक मागण्यांच्या रकमा वाटप करण्यापूर्वी **कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या पूरक मागणी संदर्भात यथास्थिती नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या पूरक मागणी संदर्भात वित्त विभागाची मान्यता घ्यावी. असे मान्यता घेण्याबाबतचे प्रस्ताव पुरवणी मागण्यांच्या मूळ नस्तीवर सादर करण्यात यावेत. मूळ तरतूद अखर्चित असल्यास पुरवणी मागणी वितरीत करण्यासाठी विवक्षित कारणे असल्याशिवाय सरसकट प्रस्ताव नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाला पाठवू नयेत.**

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०७२८१७०५५५३७०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=476d37b83707d4fa8d081fe85145aa8df78154c98a1889573cd2900918d397e5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A256E2285AACFD4CDF1A5A468970133F213ECC0C01D84AA031BA50479F2EEF89, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2023.07.28 17:07:48 +05'30'

**( पां. जो. जाधव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
४) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
७) सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१.
९) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-३२.

१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-३२.

१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई-३२.

१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१५) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१६) निवड नस्ती, अर्थ-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.